आधुनिक सीमा तपासणी नाके कार्यान्वित करुन विविध सेवांकरिता सेवा शुल्क आकारण्यास मान्यता देण्याबाबत.......
(बोरगांव, अक्कलकुवा, शिनोली)

# महाराष्ट्र शासन

## गृह (परिवहन)विभाग

## शासन निर्णय क्रमांकः सीतना-०८१४/प्र.क्र.२७२/परि-४

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई
दिनांक: २५ जानेवारी, २०१७

**वाचा -**

१) शासन निर्णय गृह विभाग क्र.एमव्हीडी-१२०८/प्रक्र.१६/परि-४, दि.२५.०३.२००८
२) शासन पुरक पत्र क्र.एमव्हीडी-१२०८/प्रक्र.१६/परि-४, दि.२५.०६.२००८
३) शासन अधिसूचना क्र.एमव्हीआर-१२०७/प्रक्र.४५४/ पुनर्बांधणी-१४/ परि-२, दि.९.८.२०१२
४) शासन निर्णय गृह विभाग क्र.सीतना-१०१३/प्रक्र.३६६/परि-४,दि.१३.११.२०१३
५) शासन अधिसूचना क्र.सीतना-०२१३/प्रक्र.४३/परि-४, दि.०८.०४.२०१३
६) शासन निर्णय क्र. सीतना-१०१३/प्रक्र.३६६/परि-४,दि.२१.११.२०१४
७) शासन अधिसूचना क्र.सीतना-०७१५/प्र.क्र.२०५/परि-४, दि.१८.१०.२०१६.

**प्रस्तावना -**

संदर्भाधीन १ व २ येथील शासन निर्णय, पुरकपत्र आणि दि.०९.०८.२०१२ च्या अधिसूचनेन्वये परिवहन विभागाच्या २२ सीमा तपासणी नाक्यांचे बांधा, वापरा व हस्तांतरण या तत्वावर आधुनिकीकरण करण्याचा निर्णय घेण्यात आला आहे. सदर प्रकल्पाच्या अंमलबजावणीस्तव महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळाची प्रकल्प अंमलबजावणी संस्था (Project Implementation Agency) म्हणून नियुक्ती करण्यात आली आहे. सदर प्रकल्पासाठी मे.महाराष्ट्र बॉर्डर चेक पोस्ट नेटवर्क लि.यांच्याशी कन्सेशनरी (Special purpose vehicle) म्हणून दिनांक ३०.०३.२००९ रोजी करार करण्यात आला आहे. या कराराच्या भाग-२ च्या खंड (जी) नुसार मे.महाराष्ट्र बॉर्डर चेक पोस्ट नेटवर्क लि.यांच्याबरोबर २४ वर्षे ६ महिने हा कालावधी कन्सेशन पिरियड म्हणून निश्चित करण्यात आला आहे. तसेच महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळाने सदर प्रकल्पांचे कार्यान्वयन आदेश (वर्क ऑर्डर) दिनांक ५ मे,२००९ रोजी जारी केले आहेत.

उपरोक्त संदर्भ क्र.३ च्या दि. ०९/०८/२०१२ च्या अधिसूचनेन्वये महाराष्ट्र मोटार वाहन नियम १९८९ च्या नियम २२३ (६) मध्ये सुधारणा करण्यात आली असून नियम २२३ (६)(अ) चा अंतर्भाव करण्यात आला आहे. सदर नियमानुसार सीमेवरील तपासणी नाक्यावर किंवा इतर नाक्यावर वाहन मालकाकडून किवा वाहन चालकाकडून घ्यावयाचे प्रक्रिया शुल्क हे उक्त अधिसूचनेत विनिर्दिष्ट केल्याप्रमाणे मालाचे वजन करणे, आधार सामग्री (डाटाएंट्री), स्कॅनींग, माल चढविणे व उतरविणे, वाहनतळ इ.सेवांसाठी आणि अशा तपासणी नाक्यावर देण्यात येणा-या अनुक्रमे इतर संबध्द सेवांसाठी वेळोवेळी विनिर्दिष्ट करील, अशी तरतूद करण्यात आली आहे. त्याचप्रमाणे संदर्भ क्र. ५ च्या दि. ०८/०४/२०१३ च्या शासन अधिसूचनेनुसार प्रक्रिया शुल्क त्याचा कालावधी इ.तपशिल प्रसिध्द केला आहे. तसेच, संदर्भाधीन क्र.७ च्या दि. १८/१०/२०१६ च्या अधिसुचनेनुसार विहित केलेल्या सेवांवरील प्रक्रिया शुल्कावर वेळोवेळी लागू असलेल्या दराप्रमाणे सेवाकर आणि उपकर वसूल करण्यात येईल आणि वसूल करण्याची तरतूद लागू करण्यात आली

आहे. त्यानुसार सेवा पुरवठादाराने तयार केलेल्या बोरगांव, अक्कलकुवा व शिनोली या सीमा तपासणी नाक्यावर सेवा शुल्क आकारण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

महाराष्ट्र मोटार वाहन नियम १९८९ च्या नियम २२३ (६) (अ) अंतर्गत प्रदान शक्तींचा वापर करुन पुढील तक्यात नमूद आधुनिक सीमा तपासणी नाक्यांवर वाहनमालकाकडून/वाहन चालकाकडून शासन अधिसूचना क्रमांक सीतना-०२१३/प्रक्र.४३/परि-४, दिनांक ०८.०४.२०१३ अन्वये तसेच, शासन अधिसूचना क्रमांक सीतना-०७१५/प्र.क्र.२०५/परि-४, दि. १८/१०/२०१६ अन्वये विहित केल्यानुसार सेवा प्रक्रिया शुल्क आणि त्यावरील सेवा कर आणि उपकर मे.महाराष्ट्र बॉर्डर चेक पोस्ट नेटवर्क लि.यांना वसूल करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | जिल्हा | तालुका | महामार्ग क्र. व नांव | नाक्याचे नांव |
|---|---|---|---|---|
| १ | नाशिक | सुरगाणा | रा. मा. क्र.२३ | बोरगांव |
| २ | नंदुरबार | अक्कलकुवा | रा. मा. क्र.४ | अक्कलकुवा |
| ३ | कोल्हापूर | चंदगड | रा. म. क्र.१२१ | शिनोली |

२. उपरोक्त आदेशाची अंमलबजावणी हा शासन निर्णय निर्गमित झाल्याच्या दिनांकापासून करण्यात येईल.

३. संदर्भाधीन अ.क्र. १ व २ येथील शासन निर्णयातील तसेच करारातील अटी व शर्तीचे पालन करण्यात यावे. निविदा सेवांकरिता स्वीकारलेल्या प्रक्रिया शुल्काच्या तपशीलवार पावत्या मे.महाराष्ट्र बॉर्डर चेक पोस्ट नेटवर्क लि. हे जारी करतील. तसेच सेवापुरवठादार याबाबतचे अभिलेख परिवहन आयुक्त यांना दरमहा सादर करतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०१२५१४०५४३५२२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Tikamdas N Shikharame

Digitally signed by Tikamdas N Shikharame
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Section Officer, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Tikamdas N Shikharame
Date: 2017.01.27 12:39:56 +05'30'

**(टि.न.शिखरामे)**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा.राज्यपाल, यांचे खाजगी सचिव
२. मा.मंत्री (परिवहन) यांचे खाजगी सचिव

३. मा.राज्यमंत्री (परिवहन) यांचे खाजगी सचिव
४. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
५. प्रधान सचिव परिवहन यांचे स्वीय सहायक
६. विक्रीकर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, विक्रीकर भवन, माझगांव, मुंबई
७. आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क, महाराष्ट्र राज्य, जुने जकात घर, मुंबई
८. परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई
९. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ, नेपीयनसी रोड/वांद्रे (पश्चिम), मुंबई
१०. प्रादेशिक परिवहन अधिकारी, कोल्हापूर/नाशिक
११. उप प्रादेशिक परिवहन अधिकारी, नंदुरबार
१२. मे.बॉर्डर चेक पोस्ट नेटवर्क लि.
१३. निवड नस्ती, परिवहन-४.